महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाच्या संविधिक पदांना वेतनश्रेणी लागू करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,
शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०२१/प्र.क्र.७५/उद्योजकता
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ जून, २०२४.

**वाचा :** १) महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ अधिनियम, २०२१ (सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७ ) दि.२३ मार्च,२०२१.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दि.०८ मार्च, २०१९.

३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, अधिसूचना क्र.वेतन-२०१९/प्र.क्र.२७८/१९/विशि-१, दि.०८ डिसेंबर, २०२०.

४) वित्त विभाग, अधिसूचना क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.१/सेवा-९, दि.३० जानेवारी, २०१९.

५) कुलगुरु, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ यांचे पत्र क्र.म.रा.कौ.वि./वेतनश्रेणी निश्चिती/२०२२-२३/९९, दि.१२ ऑक्टोबर, २०२२.

६) कुलसचिव, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ यांचे पत्र क्र.म.रा.कौ.वि./समिती स्थापना/२०२२-२३/५७८, दि.२६ जुलै, २०२३.

७) कुलसचिव, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ यांचे पत्र क्र.म.रा.कौ.वि./प्रशासन/ २०२३-२४/१२९३-अ, दि.२७ डिसेंबर, २०२३.

**प्रस्तावना:**

राज्यातील युवक-युवतींना, एकात्मिक आणि समग्र स्वरुपाचे कौशल्य प्रशिक्षण देण्याकरीता पोषक वातावरणनिर्मिती करण्यासाठी राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील मान्यताप्राप्त कौशल्याधारित उच्च शिक्षणाव्दारे रोजगारक्षम करुन त्यांना रोजगार/ स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी, राज्यात “महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ” स्थापन करण्यास व यासंदर्भातील विधेयक, २०२१ च्या प्रारुपास, दि.१७.०२.२०२१ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मा.मंत्रीमंडळाने मान्यता दिली. त्यानुसार, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ अधिनियम, २०२१ (सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७) दि.२३ मार्च, २०२१ नुसार राज्यात महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ स्थापन करण्यात आले आहे.

महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ अधिनियम, २०२१ मधील कलम ११ अन्वये, "१)कुलगुरु; २)कुलसचिव; ३) कौशल्य विभाग प्रमुख; ४) वित्त व लेखा अधिकारी; ५)विधी अधिकारी; ६) संचालक, मूल्यनिर्धारण व मूल्यमापन; ७) संचालक, नवोपक्रम, नवसंशोधन व उपक्रम व ८) संचालक, समुपदेशन व पदस्थापना" या ८ संविधिक पदांची निर्मिती करण्यात आली असून सदर पदांना विद्यापीठ अनुदान आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार ७ व्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ अधिनियम, २०२१ मधील कलम ११ अन्वये, विद्यापीठाकरिता निर्माण करण्यात आलेल्या खाली नमूद ८ संविधिक पदांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार ७ व्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी लागू करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नाव | पद संख्या | वेतनश्रेणी व्या६)वेतन आयोगानुसार( | ग्रेड पे | वेतनश्रेणी )७व्या वेतन आयोगानुसार( |
|---|---|---|---|---|---|
| १ | कुलगुरु | ०१ | ७५५००/- | -- | रु.२,१०,०००+ विशेष भत्ता रु.११, २५० |
| २ | कुलसचिव | ०१ | ३७४००-६७००० | ८९०० | १,३१, १००(Level S-२९) |
| ३ | कौशल्य विभाग प्रमुख | ०१ | ३७४००-६७००० | ८९०० | १ ,३१, १००(Level S-२९) |
| ४ | वित्त व लेखा अधिकारी | ०१ | ३७४०० -६७००० | ८९०० | १,३१,१०० (Level S-२९) |
| ५ | संचालक, मूल्यनिर्धारण व मूल्यमापन | ०१ | ३७४०० -६७००० | ८९०० | १,३१,१०० (Level S-२९) |
| ६ | संचालक, नवोपक्रम, नवसंशोधन व उपक्रम | ०१ | ३७४०० -६७००० | ८९०० | १,३१,१०० (Level S-२९) |
| ७ | संचालक, समुपदेशन व पदस्थापना | ०१ | ३७४०० -६७००० | ८९०० | १,३१, १००(Level S-२९) |
| ८ | विधी अधिकारी | ०१ | १५६००-३९१०० | ६६०० | ६७,७०० (Level S-२३) |

२. सदर पदांना उपरोक्तप्रमाणे वेतनश्रेणी लागू केल्यानंतर त्यांच्या वेतनावर होणारा खर्च "झेड ए-०२, २२५१, सचिवालय सामाजिक सेवा, (०१)(०५) कौशल्य विकास विद्यापीठ कार्यक्रम (२२५११०७६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १९७/१४७१, दि.०१.०६.२०२१ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९१/सेवा-९, दि.०२.०५.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०६१२१५०५०९१९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRANALI GOSAVI YADAV

Digitally signed by PRANALI GOSAVI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=cf3d0778b0543e10d0a60180dca4b868819cf9dfe0af7984474200631642de70, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=193E87F0B8C5F58941E4D2FBFDB3458DEAB3864A976F06D3984C8149BB888D55, cn=PRANALI GOSAVI YADAV
Date: 2024.06.12 15:18:10 +05'30'

**( प्रणाली गोसावी-यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल तथा विद्यापीठाचे कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (कौ.रो. उ.व ना. विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. कुलगुरु, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.
५. कुलसचिव, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. वित्त व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.
९. कार्यासन-१४७१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन व्यय-६/ कार्यासन सेवा-९ व कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (उद्योजकता)